**घाटकोपर, मुंबई येथील बेकायदेशीर फलक कोसळून झालेल्या घटनेची उच्चस्तरीय चौकशी करण्यासाठी नेमलेल्या चौकशी समितीस मुदतवाढ देण्याबाबत.**




**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र :- E-१०६८३९२/H.D.५९०१३/२/२०२५/विशा-२**
दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दिनांक : २५/०४/२०२५

**वाचा :-** १) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. कल्याण-०५२४/प्र.क्र.१३१/पोल-७, दि.१०.०६.२०२४

२) गृह विभाग, शासन निर्णय, क्र : HD-३२०११/४/२०२४-O/o JT.SECY६-MHD (PG)-Home Department, दि.२९.०७.२०२४.

३) गृह विभाग, शासन निर्णय, क्र : HD-३२०११/४/२०२४-O/o JT.SECY६- MHD (PG)- Home Department, दि.११.०२.२०२५.

४) सदस्य सचिव, घाटकोपर, मुंबई फलक कोसळून झालेल्या घटनेच्या चौकशीकरिता गठीत समिती यांचे दि.०७.०४.२०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

घाटकोपर, मुंबई येथील लोहमार्ग पोलीसांच्या जमिनीवर असलेले बेकायदेशीर फलक दिनांक १३ मे, २०२४ रोजी नजिकच्या पेट्रोल पंपावर कोसळल्याने १६ निरपराध व्यक्तींचा दुर्दैवी मृत्यू झाला होता. या घटनेमुळे शहरातील जाहिरात फलक, विशेषतः शासकीय, पोलीस किंवा रेल्वे मालमत्तांवरील जाहिरात फलक यांची सुरक्षितता आणि कायदेशिरता याबाबत अनेक प्रश्न उपस्थित झाल्याने घाटकोपर, मुंबई येथील जाहिरात फलक दुर्घटनेची समयबध्द चौकशी करण्यासाठी "श्री. दिलीप भोसले, माजी मुख्य न्यायाधीश, मा. उच्च न्यायालय" यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन क्रमांक ०१ येथील शासन निर्णयान्वये चौकशी समिती गठीत करण्यात आली आहे.

घाटकोपर, मुंबई येथील पेट्रोल पंप आवारातील जाहिरात फलक पेट्रोल पंपावर कोसळणे, या प्रकरणी घटनेस जबाबदार असलेल्या बाबींची चौकशी करणे आणि भविष्यात अशा प्रकारच्या घटनांची

पुनरावृत्ती टाळणे या बाबींसाठी शिफारशी करण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक ०२ येथील शासन निर्णयान्वये श्री. दिलीप भोसले, माजी मुख्य न्यायमुर्ती यांच्या अध्यक्षतेखालील समितीची रचना व कार्यकक्षा निश्चित करण्यात आली आहे.

तसेच श्री. दिलीप भोसले, माजी मुख्य न्यायमुर्ती यांच्या अध्यक्षतेखालील नेमण्यात आलेल्या समितीस आपला अंतिम अहवाल सादर करण्यास संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये दि.३१.०३.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

समितीचे अहवाल तयार करण्याचे कामकाज अंतिम टप्प्यात असून, समितीस आपला अहवाल शासनास सादर करण्यासाठी आणखी १ महिन्याची मुदतवाढ देण्याची विनंती सदस्य सचिव घाटकोपर, मुंबई फलक कोसळून झालेल्या घटनेच्या चौकशीकरिता गठीत समिती यांनी संदर्भाधीन क्र.४ येथील पत्राद्वारे केली आहे. त्यानुषंगाने समितीस आपला अहवाल सादर करण्यासाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

घाटकोपर, मुंबई येथे बेकायदेशीर फलक कोसळून झालेल्या घटनेची उच्चस्तरीय चौकशी करण्याकरिता शासनाने मा. श्री. दिलीप भोसले, सेवानिवृत्त मुख्य न्यायाधीश, अलाहाबाद उच्च न्यायालय, यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत केली आहे. समितीस आपला अंतिम अहवाल शासनास सादर करण्याकरिता या शासन निर्णयान्वये दि.३०/०४/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर समितीची कार्यकक्षा व इतर अटी, शर्ती संदर्भाधीन क्र.१ ते क्र.३ येथील शासन निर्णयांमध्ये नमूद केल्याप्रमाणे कायम राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२५१७२७१६७७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2025.04.25 17:28:50 +05'30'

**( चेतन निकम )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास, गृहनिर्माण) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राऊशु) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंई.
६. श्री. दिलीप भोसले, माजी मुख्य न्यायमूर्ती तथा अध्यक्ष, चौकशी समिती.
७. अपर मुख्य सचिव (गृह)/प्र.स.(विशेष), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. पोलीस महासंचालक, लोहमार्ग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
१२. महानगरपालिका आयुक्त, बृहन्मुंबई.
१३. श्री. निखील गुप्ता, अपर पोलीस महासंचालक,पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. श्रीमती अश्विनी जोशी, अतिरिक्त महानगरपालिका आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका.
१५. श्री. लखमी गौतम, सह पोलीस आयुक्त, गुन्हे बृहन्मुंबई.
१६. श्री. किरण दिगावकर, उपायुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका.
१७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१९. कक्ष अधिकारी, कार्यासन पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवडनस्ती, विशा-२.